**सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (२०७००८८२) बाब-१७, संगणक खर्च अंतर्गत पुनर्विनियोजनाद्वारे निधी BDS प्रणालीवर उपलब्ध करून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- अर्थसं -०३२२/ प्र.क्र.६८/१३-स**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, २०२२

<u>वाचा :-</u> १) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक:- पुनर्वि-२३२२/प्र.क्र. (१४/२०२२)/ १७स, दिनांक:- ३१ मार्च, २०२२.

<u>प्रस्तावना</u> :-

राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणाचे नवीन वेबसाईट तयार करण्यास दिनांक २२.०९.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली. सदर वेबसाईट बनविण्यासाठी रुपये १३,५६,१२०/- इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली. महा.आय.टी.यांना सदरची रक्कम अदा केल्यानंतरच राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणाची वेबसाईट कार्यान्वित करण्यात येणार असल्याने सदर निधी महा.आय.टी. यांना अदा करण्याच्या अनुषंगाने, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयातील लेखाशीर्ष २४२५००११, बाब (५०)- इतर खर्च याखाली बचतीतून रक्कम रुपये १३.६० लक्ष इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, लेखाशीर्ष २०७००८८२ बाब- (१७) संगणक खर्च याबाबीखाली उपलब्ध करून देणेबाबत वित्त विभागाला विनंती करण्यात आली.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २०२१-२२ अंतर्गत मागणी क्रमांक व्ही-२, प्रधान लेखाशीर्ष “२४२५- सहकार” (अनिवार्य) मधील सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था (अनिवार्य), (२४२५००११) ५० इतर खर्च यामधून होणाऱ्या बचतीतून पुनर्विनियोजनाद्वारे रुपये १३.६० लक्ष (अक्षरी रुपये तेरा लाख साठ हजार) इतकी रक्कम मागणी क्रमांक व्ही-२, प्रधान लेखाशीर्ष २०७०- इतर प्रशासनिक सेवा, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, (अनिवार्य), (२०७००८८२) १७- संगणक खर्च याबाबीखाली बी.डी.एस.प्रणालीवर उपलब्ध करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २१४/ २०२२/ व्यय-२, दिनांक २६.०३.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३३१२३२७३२४७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chaudhary Anil Jayaram

Digitally signed by Chaudhary Anil Jayaram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, serialNumber=d124ae9bbd15bed87dbd08ef779cf1b85a4020339eb1c2ef0e112fb67063011c, cn=Chaudhary Anil Jayaram
Date: 2022.03.31 23:29:30 +05'30'

**(अनिल ज. चौधरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे.
२) सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/ नागपूर
४) महालेखापाल( लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य -१/२, मुंबई/ नागपूर
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
६) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७) उप सचिव (व्यय-२) व (अर्थ-१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) अवर सचिव (१७स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभग, मंत्रालय,मुंबई.
९) कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभग, मंत्रालय,मुंबई.

**प्रत,**

१. मा.अपर मुख्य सचिव (सहकार व पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
२. निवडनस्ती कार्यासन १३स.